**भूखंडाचा विकास करताना गौण खनिजाच्या उत्खननाबाबत परवानगी देण्याबाबतची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः गौखनि-१०/११२१/प्र.क्र.२९२/ख-२**

पहिला मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

तारीख: ०९ मे, २०२३

**संदर्भ:-**

१) महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३

२) शासन परिपत्रक क्रमांक गौखनि-१०/१०१२/प्र.क्र.६०३/ख, दि.०१.११.२०२१.

**प्रस्तावना:-**

खाण व खनिज (विकास व विनियमन) अधिनियम,१९५७ (१९५७ चा ६७) यांच्या कलम १५(१)(३) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३ तयार करुन दिनांक १९.०८.२०१३ रोजीच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले आहे.

संदर्भाकीत क्र. २ शासन परिपत्रकाद्वारे एखाद्या भूखंडाचा विकास करताना माती, मुरुम, दगड अशा सर्व प्रकारच्या गौण खनिजाचे उत्खनन करुन ते गौण खनिज त्याच भूखंडाच्या सपाटीकरणाकरिता वापरले जाईल किंवा ती अशा भूखंडाच्या विकासाच्या प्रक्रियेतील कोणत्याही कामासाठी वापरली जाईल, त्यावेळी अशा गौण खनिजावर स्वामित्वधन आकारणीस पात्र राहणार नाही अश्या सूचना देण्यात आल्या असून याबाबतीत भूखंडाचा विकास म्हणजे शेतीची सुधारणा किंवा नियोजन प्राधिकारी यांनी मंजूर केलेल्या अभिन्यासाचे किंवा विकास परवानगीत समाविष्ट असलेले संपूर्ण क्षेत्र ज्यात एका पेक्षा जास्त गट नंबर किंवा भूमापन क्रमांकाचा समावेश असू शकतो.

परंतु भूखंडाच्या काही क्षेत्रामध्ये त्या भूखंडाचा विकास करताना भूखंडातून उत्खनन होणारी संपूर्ण गौण खनिज त्याच भूखंडाच्या विकासाकरिता वापरणे शक्य होत नाही. अशा भूखंड विकासकाच्या कामासाठी विकासकांमार्फत क्षेत्रीय यंत्रणेची परवानगी घेण्यात आली आहे काय याबाबत तपासणी करण्यात येते. सदर तपासणीच्या वेळी विकासकाकडून परवानगीपेक्षा जास्त उत्खनन केले असल्याचे निदर्शनास आल्यास महाराष्ट्र जमीन महसुल संहिता, १९६६ च्या कलम ४८(७) नुसार दंडात्मक कारवाई करण्यात येते.

क्षेत्रीय अधिका-यांनी केलेल्या सदरहू दंड व मोजमापाबद्दल विकासकांमार्फत मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल होत आहेत. त्याअनुषंगाने विकासकामार्फत विकास करण्यात येणा-या क्षेत्रफळाचा विचार करुन त्याआधारे सर्वसाधारणपणे किती प्रमाणात गौण खनिजाची वाहतूक भूखंडाच्या बाहेर केली जाऊ शकते तसेच सर्वसाधारणपणे किती गौण खनिज त्याच ठिकाणी वापरणार आहेत याचा विचार करुन त्यावर स्वामित्वधन आकारण्याबातच्या कार्यपध्दती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रकः-</u>**

महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) (सुधारणा) नियम,२०१५ अन्वये सुधारणा केली असून, मुख्य नियम-४६ मधील उपनियम (१) अन्वये जमीनीच्या भूखंडाचा विकास करताना नियोजन प्राधिकरणाने मंजूर केलेल्या भूखंडाचा विकास आराखडा/ बांधकाम परवाना यामध्ये अंतर्भूत गौण खनिज उत्खननाचे परिमाण विचारात घेवून त्यावर खालीलप्रमाणे स्वामित्वधन आकारणी करण्यात येईल:-

| **अ.क्र.** | **नियोजन प्राधिकरणाने मंजूर केलेल्या भूखंडाचे क्षेत्र (हेक्टर)** | **विकासाकरिता नियोजन प्राधिकरणाने मंजूर केलेल्या भूखंडाच्या सदर भूखंडातून उत्खनन होणाऱ्या गौण खनिजावर आकारावयाचे स्वामित्वधन** |
|---|---|---|
| १ | १ हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी | उत्खनन होणाऱ्या गौण खनिजाच्या ५०% गौण खनिजावर |
| २ | १ हेक्टर पेक्षा जास्त ते ५ हेक्टर पेक्षा कमी | उत्खनन होणाऱ्या गौण खनिजाच्या २५% गौण खनिजावर |
| ३ | ५ हेक्टर पेक्षा जास्त ते २० हेक्टर पेक्षा कमी | उत्खनन होणाऱ्या गौण खनिजाच्या १०% गौण खनिजावर |
| ४ | २० हेक्टर पेक्षा जास्त | उत्खनन होणाऱ्या गौण खनिजाच्या ५% गौण खनिजावर |

०२. उपरोक्त तक्त्यामध्ये नमूद अनुक्रमांक १ ते ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे विकासकाने वाहतूक करावयाच्या गौण खनिजाचे स्वामित्वधन भरल्यानंतर वाहतूकीसाठी आवश्यक वाहतूक परवाना (TP) “mahakhanij” या पोर्टल मार्फत घेणे बंधनकारक राहील आणि एखाद्या विकासकास उपरोक्त नमूद परिमाणापेक्षा जादाचे गौण खनिजाची इतर ठिकाणी वाहतूक करावयाची असल्यास अशा गौण खनिजाचे स्वामित्वधन भरुन “mahakhanij” या पोर्टल मार्फत वाहतूक परवाना (TP) घेणे बंधनकारक राहील.

०३. या अनुषंगाने शासनामार्फत बांधकाम परवानगी प्राप्त करून घेताना करावयाच्या प्रक्रियेबाबत संगणकीकरण करणाची प्रक्रिया सुरू आहे. या संगणकीकरण प्रक्रियेमार्फत उपलब्ध पोर्टलवर उपरोक्त प्रमाणे होणाऱ्या उत्खननाचे प्रमाणिकरण करण्यात येणार आहे. त्यामुळे ही संगणकीकरणाची कार्यपध्दती अंमलात येईपर्यत या परिपत्रकाप्रमाणे कार्यवाही करावी.

०४. सदर परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

०५. सदर शासन परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने (त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५०६/२०२१/व्यय-९, दिनांक २८.१२.२०२१ अनुसार) निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०९१५०६३०४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, pseudonym=F963BC6AD59D767D7C33C1B8350D778425D54B0E, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2023.05.09 15:06:00 +05'30'

**(स. गो. मोहिते)**

**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. मा. विधानसभा अध्यक्ष यांचे खासगी सचिव, विधानमंडळ, मुंबई
४. मा. विधानपरिषद सभापती यांचे खासगी सचिव, विधानमंडळ, मुंबई
५. मा.मंत्री (महसूल) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री/मा. राज्यपाल यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई.
८. सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
९. सर्व मंत्रालयीन विभाग
१०. सर्व विभागीय आयुक्त
११. सर्व जिल्हाधिकारी
१२. सर्व उपविभागीय अधिकारी
१३. सर्व तहसिलदार
१४. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
१५. निवडनस्ती “ख-२” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.